कोल्हापूर जिल्ह्यातील तिलारी जलविद्युत प्रकल्पाच्या ताब्यात असलेले खालील तक्त्यात दर्शविलेले रस्ते सार्वजनिक बांधकाम विभागाकडे हस्तांतरीत करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक १२०९/(१२४/२००९) ज.वि.**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ६ एप्रिल, २०१०.**

संदर्भ - दि. १५.६.२००९ रोजी मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे अध्यक्षतेखाली मा. मंत्री जलसंपदा व मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे समवेत झालेल्या बैठकीचे इतिवृत्त जलसंपदा विभाग, शासन पत्र क्र. विसप्र-१२०९/(११८/२००९) ज.वि. दिनांक २०.८.२००९ अन्वये निर्गमित केले आहे.

**शासन निर्णय**

शासन असे आदेश देत आहे की, जलसंपदा विभागाच्या ताब्यातील खाली नमूद केलेले रस्ते जलसंपदा विभागाकडून सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | रस्त्याचे नांव | रस्त्याचा दर्जा | रस्त्याची हस्तांतरीत करावयाची लांबी |
|---|---|---|---|
| १. | मोटणवाडी फाटा ते कोदाळी रस्ता | प्र.जि.मा. | १०.७० कि.मी. (कि.मी. ० ते १०.७०) |
| २. | मुख्य धरण ते माडवळे मार्गे तुर्केवाडी रस्ता | इजिमा | १४.०० कि.मी. (कि.मी. ०/० ते १४/००) |
| ३. | धामणे फाटा ते तुडीये रस्ता | इजिमा | ७.०० कि.मी. (कि.मी. ०/० ते ७/० ) |
| ४. | तिलारीनगर ते मुख्य धरण रस्ता | इजिमा | १४.०० कि.मी.(कि.मी. ०/० ते १४/०) |

जलसंपदा विभागाकडून सदरहू रस्ते सार्वजनिक बांधकाम विभागाकडे खालील अटीवर वर्ग करण्यात येत आहे.

१. या रस्त्यासाठी सध्या नेमणुकीस असलेल्या शासनाचा सेवक वर्ग सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करण्यात येऊ नये.

२. रत्याच्या या लांबीची मालकी पूर्णपणे सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील.

३. सद्यःस्थितीत रस्त्याचे भूसंपादन/वनजमिन याबाबत न्यायालयीन प्रकरणे काही नाही. रस्ता हस्तांतरीत केल्यावर त्यावरील हस्तांतरणापूर्वीची अतिक्रमणे/लिज बांधकाम, कंत्राट अथवा

इतर संलग्न न्यायालयीन प्रकरणे हाताळण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिका-यांची राहिल. संबंधित अधिकारी/प्रधिकारी यांनी वरील विषयाबाबत न्यायालयीन आदेश असल्यास त्याचा अवमान होणार नाही त्याची दक्षता घ्यावी. तसेच सदर रस्त्यांच्या उद्‌भवणारी संबंधीत न्यायालयीन प्रकरणाची कागदपत्रे प्राप्त करुन ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिका-यांची राहील.

४. रस्त्याचे परिरक्षण तसेच रस्ता सुस्थितीत ठेवणे या बाबी संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागास बंधनकारक राहतील. त्यासाठी लागणारा निधी सार्वजनिक बांधकाम विभागाने उपलब्ध करुन द्यावा.

५. हा शासन निर्णय जलसंपदा विभाग आणि सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या संदर्भाधीन शासन पत्राचे अनुमतीने काढण्यात आला आहे.

६. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००४०६१७४८३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**( वि.अ.शिंदे )**
शासनाचे उप सचिव

प्रत,

स्वीय सहायक, कार्यकारी अध्यक्ष, मंत्री दर्जा राज्य नियोजन मंडळ,मंत्रालय,मुंबई
स्वीय सहायक, मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, मा. मंत्री (जलसंपदा व लाक्षेवि), मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, सचिव (रस्ते), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र,मुंबई/नागपूर
स्वीय सहायक, मुख्य अभियंता (ज.सं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई.
मुख्य अभियंता, कोकण प्रदेश,जलसंपदा विभाग, मुंबई. (५ प्रती)
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर
अधीक्षक अभियंता,कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबाव, रत्नागिरी
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, कोल्हापूर
कार्यकारी अभियंता तिलारी शीर्षकामे विभाग क्र.१ कोनाळकट्टा सिंधुदुर्ग
जवि कार्यासन, संग्रहार्थ.